सोलापूर महानगरपालिकेच्या दिनांक २९.०८.१९७० रोजीच्या सभेतील ठराव क्रमांक १४१ तसेच दिनांक १८.०२.२०१६ रोजीच्या सर्वसाधारण सभेतील ठराव क्रमांक ३०२ निलंबित करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- लोलेस-२०२१/प्र.क्र.१०७/नवि-१८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १३.०४.२०२२

**संदर्भ** :- १) सोलापूर महानगरपालिका सर्वसाधारण सभा ठराव क्र. १४१, दि. २९.०८.१९७०
२) सोलापूर महानगरपालिका सर्वसाधारण सभा ठराव क्र. ३०२, दि. १८.०२.२०१६
३) आयुक्त, सोलापूर महानगरपालिका यांचे पत्र क्र.नआ/वै/५३९, दिनांक २०.१०.२०२१

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या अनुसूची-ड अंतर्गत प्रकरण क्रमांक ८ च्या नियम ७ (१) नुसार मालमत्ता कराच्या आकारणीस पात्र असलेल्या कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे करयोग्य मुल्य ठरवण्यासाठी, ज्या वार्षिक भाड्याने अशी जमीन किंवा इमारत वर्षावर्षाने वाजवीरित्या भाड्याने देता येईल, अशी अपेक्षा असेल अशा वार्षिक भाड्याच्या रकमेतून उक्त वार्षिक भाड्याच्या १० टक्के इतकी रक्कम वजा केली पाहिजे, अशी तरतूद आहे. सदर तरतूदीमध्ये दुरूस्ती करुन १० टक्के ऐवजी १५ टक्के वजावट करण्याचे प्रस्तावित करुन शासनाने दिनांक ०३.१२.१९६९ च्या पत्रान्वये अधिसूचनेची प्रारुपे महानगरपालिकांना पाठवून त्यांचे अभिप्राय मागविण्यात आले होते. सदर अधिसूचना प्रारुप स्वरुपात असून ती अंतिम झालेली नाही. दरम्यानच्या कालावधीत शासनाची अंतिम अधिसूचना नसताना सोलापूर महानगरपालिकेने त्यांच्या दिनांक २९.०८.१९७० च्या ठराव क्रमांक १४१ अन्वये आपल्या स्तरावर उपरोक्त अधिनियमातील तरतूदी दुरूस्ती करुन १० टक्के ऐवजी १५ टक्के वजावट करण्याचा ठराव पारीत केला.

यासंदर्भात चूकीची दुरूस्ती व्हावी याद्दष्टिने सोलापूर महानगरपालिकेने सर्वसाधारण सभेसमोर प्रस्ताव सादर करुन अधिनियमातील तरतूदीनुसार १० टक्के वजावट करण्याचे प्रस्तावित केले होते, तथापि पुन्हा सर्वसाधारण सभेने दिनांक १८.०२.२०१६ रोजी ठराव क्रमांक ३०२ पारीत करुन पूर्वीच्याच दिनांक २९.०८.१९७० च्या ठराव क्रमांक १४१ नुसार कार्यवाही करण्यास मान्यता दिली.

सदर ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ४५१ (१) मधील तरतुदीनुसार अधिनियमातील अनुसूची-ड अंतर्गत प्रकरण क्रमांक ८ च्या नियम ७ (१) मधील तरतूदीचा भंग ठरत असल्याने सदरचे दोन्ही ठराव विखंडीत करणे आवश्यक ठरते, असे शासनाचे मत झाले आहे. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय :-**

सोलापूर महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेतील दिनांक २९.०८.१९७० रोजी पारित केलेला ठराव क्रमांक १४१ तसेच दिनांक १८.०२.२०१६ रोजी पारित केलेला ठराव क्रमांक ३०२ मधील मंजूर केलेली बाब महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ४५१ (१) मधील तरतूदीनुसार

अधिनियमातील अनुसूची-ड अंतर्गत प्रकरण क्रमांक ८ च्या नियम ७ (१) मधील तरतूदीचा भंग ठरत असल्याने सदरचे दोन्ही ठराव विखंडीत करण्याच्या हेतुने कलम ४५१ (१) अन्वये प्रथमत: सदरचे दोन्ही ठराव निलंबित करण्यात येत आहेत. त्यानुसार याप्रकरणी संबंधितांना काही अभिवेदन करावयाचे असल्यास निलंबन आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत सदर अभिवेदन सादर करण्याची संधी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४१३१५०७००५६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**.

VILAS NATHA DHAIJE

Digitally signed by VILAS NATHA DHAIJE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2cbfac8a74f547d6db7c665bc59a04c3d5f9e582a842e3ae0aac1309f797f88a, serialNumber=9b34e2dd1552c4209100df5fb96a2cdcb5ce5ac0a7e1df80a5aa7ed2f6e611a5, cn=VILAS NATHA DHAIJE
Date: 2022.04.13 15:07:43 +05'30'

**(वि.ना.धाईजे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रशासक, सोलापूर महानगरपालिका, सोलापूर

२) आयुक्त, सोलापूर महानगरपालिका, सोलापूर

यांना विनंती करण्यात येते की, सदर आदेश संबंधितांच्या निदर्शनास आणण्यात यावेत, तसेच त्यांना सदर आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या कालावधीत शासनाकडे अभिवेदन करावयाचे असल्यास ते करता येईल, ही बाब अवलोकीत करण्यात यावी.

३) नगर सचिव, सोलापूर महानगरपालिका

४) मा. मंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५) मा. राज्यमंत्री, नगर विकास विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६) निवड नस्ती (नवि-१८), नगर विकास विभाग.